GR-20040408155 748001-000

मागासवर्गीयांचा सरळसेवा भरती अनुशेष भरून काढण्याची विशेष भरती मोहिम सुरू करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-बीसीसी-१०९५/९६६/प्र.क्र.५/९५/१६-ब,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- २९-ऑगस्ट-१९९८.

पहा :- १) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०८९/प्र.क्र.२२९/८९/१६-ब, दिनांक :- १२-जुलै-१९८९.
२) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०८९/प्र.क्र.२२९/१६-ब, दिनांक :- ११-ऑगस्ट-१९८९.
३) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०८९/प्र.क्र.३३८/८९/१६-ब, दिनांक :- ३०-सप्टेंबर-१९८९.
४) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०८९/प्र.क्र.३३८/८९/१६-ब, दिनांक :- २०-मे-१९९१.
५) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०८९/प्र.क्र.२२९/१६-ब, दिनांक :- १२-डिसेंबर-१९९१.
६) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०८९/१४२२/९३/१६-ब, दिनांक :- ११-ऑगस्ट-१९९३.
७) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.प्रनिमं-१०९३/प्र.क्र.९४/९३/१३-अ, दिनांक :- १९-ऑगस्ट-१९९३.
८) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०९३/प्र.क्र.१६०/९३/१६-ब, दिनांक :- १५-मार्च-१९९४.
९) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०९५/९६६/प्र.क्र.५/९५/१६-ब, दिनांक :- २७-जुलै-१९९५.
१०) शासन परिपत्रक, सा.प्र.वि.क्र.बीसीसी-१०९५/९६६/प्र.क्र.५/९५/१६-ब, दिनांक :- १-जुलै-१९९६.

परिपत्रक :- शासकीय, निमशासकीय सेवेत मागासवर्गीयांचा सरळसेवा भरती व पदोन्नतीमधील अनुशेष भरून काढण्यासाठी शासनाने वर नमूद केलेल्या परिपत्रकान्वये विशेष भरती मोहीम सुरू केलेली होती. या विशेष भरती मोहीमेस वेळोवेळी मुदत वाढ दिलेली होती. उपरोक्त क्रमांक ९ येथील परिपत्रकानुसार दिनांक १-४-१९९५ रोजी असलेला अनुशेष भरून काढण्यासाठी विशेष भरती मोहीम नव्याने सुरू करण्यात आला होती व अनुक्रमांक १० येथील दिनांक १-७-१९९६ च्या परिपत्रकानुसार या विशेष भरती मोहीमेस दिनांक ३१-१२-१९९६ पर्यंत मुदत वाढ देण्यात आली होती.

२ सभरवाल प्रकरणी सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निकालाची अंमलबजावणी करण्याबाबत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-बीसीसी-१०९७/प्र.क्र.६३/९७/१६-ब, दिनांक १८-१०-१९९७ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. हे आदेश २-जुलै-१९९७ पासून लागू करण्यात आले आहेत. बिंदूनामावली ही आरक्षणाची विहित टक्केवारी पूर्णहोईपर्यंत वापरात ठेवावी. विहित टक्केवारी पूर्ण होताच बिंदूनामावली वापरण्याची आवश्यकता नाही. त्यानंतर ज्या प्रवर्गाची जागा रिक्त होईल त्या प्रवर्गातील उमेदवाराची नियुक्ती करून ती जागा भरण्यात यावी. या आदेशानुसार मागासवर्गीयांचा जो अनुशेष असेल तो भरून काढण्यासाठी विशेष भरती मोहिम हाती घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

३. यापूर्वीच्या विशेष भरती मोहिमेप्रमाणेच, निवड मंडळाच्या कक्षेतील सरळ सेवेने भरावयाची अनुशेषाची पदे, वरील क्रमांक ७ येथील दिनांक १९-८-१९९३ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या जिल्हा निवड समिती मार्फत भरण्यात यावीत.

४. विशेष भरती मोहिमे अंतर्गत भरावयाची अनुशेषाची पदे १००% भरता येतील. मात्र, दिनांक १८.१०.१९९७ च्या शासन निर्णया प्रमाणे, संवर्गामध्ये मागासवर्गीयांच्या ज्या गटाचे आरक्षण, त्या गटास विहित केलेल्या आरक्षणाच्या टक्केवारीप्रमाणे पूर्ण झाले आहे, त्या गटाच्या बाबतीत बिंदूनामावलीतील बिंदू वापरण्याची आवश्यकता नाही.

५. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.बीजीटी १०९७/प्र.क्र.२४-अ/अर्थ-१९, दिनांक २.६.१९९८ अन्वये जी पदे सहा महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त राहिल्यामुळे व्यपगत होतील व ती नष्ट करण्यात येतील असे जे आदेश दिले आहेत ते आदेश विशेष भरती मोहिमेअंतर्गत भरावयाच्या अनुशेषांच्या पदांसाठी लागू होणार नाहीत.

शागमु--रोटा--साप्रवि--एच--868(5000--9--98)

(कृ.मा.प.

६. वरील आदेशानुसार निम शासकीय सेवांमध्ये म्हणजेच मंडळे, महामंडळे, महानगरपालिका, नगरपालिका, जिल्हा परिषदा, अनुदानित शैक्षणिक संस्था, सहकारी संस्था, शासनाचे सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम, इ.मध्ये विशेष भरती मोहिम सुरु करण्यासंबंधीचे त्या त्या विभागाने उचित आदेश निर्गमित करावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(शि.शा.हिरीजगनेर),
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्य मंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सचिव, राज्य निवड मंडळ,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळे,
संचालक, समाज कल्याण, पुणे,
संचालक, आदिवासी विकास, नाशिक,
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
संचालक, सेवा योजन, मुंबई,
सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी प्रकल्प,
सर्व जिल्हा सेवा योजन अधिकारी,
मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.

* पत्राने.

---

एच–868(5000–9–98)अ.